SNA-SPARSH कार्यपध्दतीद्वारे केंद्र पुरस्कृत योजनांचा निधी वेळेवर वितरीत करण्यासाठी 'महाराष्ट्र राज्य सायबर कोषागार' करिता आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करणे

**महाराष्ट्र शासन**
**कृषि व पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०२५/प्र.क्र.७०/२अे,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांकः ११ जून, २०२५

वाचा -

१. वित्त विभागाकडील शासन निर्णय क्रमांक एसएनए-२०२४/प्र.क्र.५१/कोषा-प्रशा-४,दि.१०/१०/२०२४

२. वित्त विभागाकडील शासन निर्णय परिपत्रक क्रमांक संकीर्ण -२०२४/प्र.क्र.५१/कोषा-प्रशा-४, दि.११/१०/२०२४

३. कृषी विभागाकडील शासन निर्णय क्रमांक एसएनए-२०२४/प्र.क्र.८४/२-अे, दि. १४/१०/२०२४

४. वित्त विभागाकडील शासन निर्णय क्रमांक संकीर्ण-२०२४/प्र.क्र.५४/कोषा-प्रशा-४,दि.२३/०४/२०२५

**प्रस्तावना:**

कृषि विभागाकडून राबविण्यात येणाऱ्या केंद्र पुरस्कृत योजनांचा निधी वितरीत करण्याकरिता "SNA-SPARSH" प्रणाली लागू करण्या त आलेली आहे. "SNA-SPARSH" प्रणालींतर्गत वित्त विभागाने Single Nodal Account Portal (SNAP) प्रणाली विकसित केलेली आहे. संदर्भ ३ अन्वये कृषि विभागाकडील केंद्र पुरस्कृत योजनांकरिता आयुक्त (कृषि) यांना एकल समन्वय यंत्रणा म्हणून घोषीत केले आहे. सद्य:स्थितीत, कृषि विभागाकडील केंद्र पुरस्कृत १४ योजना "SNA-SPARSH" प्रणालीमार्फत राबविण्यात येत आहेत. संदर्भ ४ अन्वये महाराष्ट्र राज्यामध्ये SNA SPARSH समायोचित प्रणाली एकीकृत शीघ्र हस्तांतरण कार्यपध्दतीद्वरे फक्त केंद्र पुरस्कृत योजनांच्या अंमलबजावणीसाठी निधी भारतीय रिझर्व्ह बँकेच्या ईकुबेर प्रणालीच्या माध्यमातून वेळेवर -संवितरीत करण्याच्या मुख्य प्रयोजनार्थ महाराष्ट्र राज्य सायबर कोषागाराची स्थापना करण्यात आली आहे. सदर शासन निर्णयामधील मुद्दा क्र. ६ अन्वये संबधित प्रशासकीय विभागातील विहीत कार्यपध्दतीनुसार सायबर कोषागार कार्यालयामार्फत देयके सादर करण्याकरिता आहरण व संवितरण अधिकारी घोषित करण्याची आणि नवीन आहरण व संवितरण अधिकारी सांकेताक घेण्याची कार्यवाही दि. ३०.०६.२०२५ पूर्वी करतील, असे नमूद आहे. सबब, कृषि विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या केंद्र पुरस्कृत योजनांकरीता सायबर कोषागारावर देयके आहरीत करण्याकरीता आहरण व संवितरण अधिकारी घोषित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

कृषि विभागाकडील SNA SPARSH प्रणालीद्वारे केंद्र पुरस्कृत योजनांतर्गत राज्य संलग्नित योजनांची अंमलबजावणी आयुक्त कृषि यांचेमार्फत करणेत येत आहे, अशा सर्व राज्य संलग्नित योजनांचा निधी सायबर कोषागार कार्यालयातून (कोषागार सांकेतांक-८१०१) देयकाद्वारे आहरीत करण्यासाठी एकल समन्वय यंत्रणा असलेल्या आयुक्त (कृषि), पुणे यांच्या कार्यालयातील सहाय्यक संचालक यांना आणि महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे यांच्या कार्यालयातील लेखाधिकारी यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

२. SNA SPARSH कार्यपध्दतीमध्ये अंमलबजावणी यंत्रणांना त्यांचेकडील मागणीपत्र ई- हस्ताक्षर करुन योजनांच्या एकल समन्वय यंत्रणेतील घोषित आहरण व संवितरण अधिकाऱ्यांकडे पाठविण्यात येतात. त्यानुषंगाने ई- हस्ताक्षर करण्याकरीता खालीलप्रमाणे संबंधित अधिकाऱ्यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

| अ.क्र. | स्तर | कार्यालयाचे नाव | ई-हस्ताक्षर करण्याकरीता प्राधिकृत अधिकारी |
|---|---|---|---|
| १ | कृषि आयुक्तालय | कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे | सहाय्यक संचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे |
| २ | महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे | महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे | लेखाधिकारी, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे |
| ३ | जिल्हास्तर | जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी यांचे कार्यालय | जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी |
| | | प्रकल्प संचालक, आत्मा यांचे कार्यालय | प्रकल्प संचालक, आत्मा |
| ४ | इतर विभाग | इतर विभागांतील कार्यालये | संबंधित विभाग घोषित करतील ते अधिकारी |

३. उपरोक्त आहरण व संवितरण अधिकारी यांनी आहरण व संवितरण सांकेतांक दिनांक ३०/०६/२०२५ पूर्वी प्राप्त करुन घेण्याची कार्यवाही करावी.

४. अंमलबजावणी यंत्रणांनी मागणीपत्र तयार करताना योजना अंमलबजावणीचे प्रचलित नियम, शासन निर्णय, विभागाने दिलेले निर्देश विचारात घेवून खर्चास सक्षम प्राधिकारी यांची मान्यता घेण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्र. २०२५०६११११४४२२५९९०१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटील स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशान्वये व नावाने

KARAD SANTOSH BANSIRAO

Digitally signed by KARAD SANTOSH BANSIRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=Agriculture and ADF Department,
2.5.4.20=F981D5A9FEC2E5D5DC36F39695B5F0E4FF5B340CD5420DF7CBAA28990D692E36, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=90BBB9D3E7E74DE43F8070E2A9A65BFD42747F1995A4F22FDC0240939AAB0835, cn=KARAD SANTOSH BANSIRAO
Date: 2025.06.11 14:43:24 +05'30'

**(संतोष कराड)**

**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. मा. मंत्री (कृषि), महाराष्ट्र राज्य, मुंबई
३. मा. राज्यमंत्री (कृषि), महाराष्ट्र राज्य, मुंबई
४. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई
५. अप्पर सचिव (नियोजन),नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
६. अप्पर मुख्य सचिव (वित्त),वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
७. प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
८. प्रधान सचिव (माहिती व तंत्रज्ञान),सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
९. प्रधान सचिव (सामाजिक न्याय ),सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. सचिव (आदिवासी विकास विभाग), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
११. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय,पुणे
१२. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे.
१३. व्यवस्थापकीय संचालक (महाआयटी), महा आयटी, एपीजे हाऊस, मुंबई
१४. संचालक, माहिती व तंत्रज्ञान संचालनालय, मंत्रालय, मुंबई
१५. सह सचिव/उप सचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
१६. कृषि संचालक (सर्व) कृषि आयुक्तालय,पुणे
१७. विभागीय कृषि सहसंचालक, (सर्व)
१८. जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, (सर्व)
१९. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर,
२०. कक्ष अधिकारी, (विनियम कार्यासन)/(व्यय कार्यासन), वित्त विभाग विभाग, मंत्रालय, मुंबई
२१. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
२२. जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
२३. निवासी लेखापरिक्षा अधिकारी मुंबई
२४. निवड नस्ती (२-अे)